**शिराळा, जिल्हा सांगली येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रूग्णालयाच्या बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१४/ प्र.क्र.१४५/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकुळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ३ जुन, २०१५.

**वाचा**

१) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः संकीर्ण-२०१२/ प्र.क्र.१४१/ आरोग्य-३, दि.१७.०१.२०१३.**

२) **शासकीय इमारतींच्या बांधकामांना मंजुरी देण्याबाबतच्या सचिव समितीच्या दिनांक १३.०३.२०१५ रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त.**

३) **अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य संस्थांमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम ), मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/ राज्यस्तर/ उपजिरूशिराळा/ श्रेणीवर्धन/ बांध/ टे.६/ कक्ष-३/ १४, दि.११.०६.२०१४.**

**प्रस्तावना**

संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्यात सन २००१ च्या लोकसंख्येवर आधारीत आरोग्य संस्था स्थापनेच्या बृहत आराखड्यास मान्यता देण्यात आली आहे. या बृहत आराखड्यामध्ये सांगली जिल्ह्यातील शिराळा येथील ३० खाटांच्या ग्रामीण रूग्णालयाचे ५० खाटांच्या उपजिल्हा रूग्णालयात श्रेणीवर्धन सद्यस्थितीत येथे असलेच्या ३० खाटांच्या ग्रामीण रूग्णालयाची इमारत अपुरी पडत असून जीर्ण झालेली आहे. या अनुषंगाने अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा यांनी ५० खाटांच्या उपजिल्हा रूग्णालयाच्या इमारतीच्या बांधकामांचे एकूण रूपये १६,०६,०६,७०३/- इतक्या किंमतीचे अंदाजपत्रक व आराखडे प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहेत. सदर अंदाजपत्रक मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे-१ यांनी प्रमाणित केलेले असून ते सन २०१२-१३ च्या दरसूचीवर आधारीत आहेत. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

शासकीय इमारतींच्या बांधकामांना मंजुरी देण्याबाबतच्या सचिव समितीच्या दिनांक १३.०३.२०१५ रोजी पार पडलेल्या बैठकीत मंजूरी दिल्यानुसार या शासन निर्णयान्वये शिराळा, जि. सांगली येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रूग्णालयाच्या बांधकामाच्या पुढील प्रमाणे बाबी समाविष्ट असणा-या एकूण रूपये १४६९.२४ लक्ष (अक्षरी रूपये चौदा कोटी एकोणसत्तर लक्ष चोवीस हजार मात्र ) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रक व आराखड्यास खालील नमूद अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**Recapitulation Sheet**

| Sr.No. | ( A ) Essential Items | Cost ( Rs. ) |
|---|---|---|
| 1. | Building proper [ G+1 ] | |
| | Area of Building (sqmt) | 3196.83 |
| | Rate of Construction | 27,552.00 |
| | Estimated Cost of Construction | 8,80,82,100.00 |
| 2. | Electrification | |
| | **a)** Internal ( 5 % of cost of building proper ) | 44,04,105.00 |
| | **b)** External ( 6% of cost of building proper) | 52,84,926.00 |
| 3. | Water supply & sanitation ( 5 % of cost of building proper ) | 44,04,105.00 |
| 4. | Compound wall & gate as per detailed est. | 36,88,038.00 |
| 5. | Internal Roads & parking as per detailed est. | 16,83,200.00 |
| 6. | Furtniture @ Rs.5000/ sqm. | 1,59,84,150.00 |
| 7. | Rain water harvesting lump-sum | 2,00,000.00 |
| 8. | Fire fighting arrangement lump-sum | 20,00,000.00 |
| 9. | Land development lump-sum | 15,00,000.00 |
| | **Sub total** | 12,72,30,624.00 |
| | Contingencies ( 4 % ) | 50,89,225.00 |
| **(A)** | **Total** | 13,23,19,849.00 |
| **(B)** Optional items | | |
| 1 | Bore+ pump lump-sum | 2,00,000.00 |
| 2 | Air Conditioning lump-sum | 44,04,105.00 |
| 3 | Lift | 70,00,000.00` |
| 4 | External Toilets lump-sum | 20,00,000.00 |
| 5 | Solar energy systems | 10,00,000.00 |
| | Sub **Total** | 1,46,04,105.00 |
| | **Total Cost of Project (A )+( B ) Rs.** | **14,69,23,954.00** |
| | | **Say Rs.1469.24 Lakhs** |

सदर कामावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्रमांक एच-८**

“ ४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०१- नागरी आरोग्य सेवा ( वैद्यकीय सहाय्य ) पंचवार्षीक योजना-इमारत
११०- रूग्णालये व दवाखाने
(०१)(०१)- मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ )
५३- मोठी बांधकामे ”

**अटी :-**

१. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजुर करूनच काम हाती घ्यावे.
२. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनूसार कार्यवाही करण्यात यावी.
३. अर्थसंकल्पात निधीची तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी शासनास सादर करावा.
४. तसेच अर्थसंकल्पात निधीची तरतूद केल्याशिवाय सदर बांधकामास सुरुवात करण्यात येऊ नये.
५. सदरील काम अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास त्यात ४ टक्के सेंटेज चार्जेसची तरतूद मिळविण्यात यावी.

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.३०७/इमा-३, दि.३०.०८.२०१४ अन्वये दर्शविलेल्या सहमतीनुसार तसेच शासकीय इमारतींच्या बांधकामांना मंजुरी देण्याबाबतच्या सचिव समितीच्या दिनांक १३.०३.२०१५ रोजी पार पडलेल्या बैठकीत मंजूरी दिल्यानुसार व वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दि.१५.०५.२००९ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२१४०१५३७७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Shankar Jadhav

Digitally signed by Ramchandra Shankar Jadhav
DN: CN = Ramchandra Shankar Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.03 15:18:34 +05'30'

**रा.शं.जाधव**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य संस्थांमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम), मुंबई
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा (कोल्हापूर मंडळ), कोल्हापूर.
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे-१.
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, सांगली.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
९. महालेखापाल,१/२महाराष्ट्र(लेखा व लेखापरिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
१०. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-४).